काटोल नगरपरिषद हद्दीतील रस्ता
अवर्गीकृत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- रवियो-२०१७/प्र.क्र.२६/नियोजन-२**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.**
**दिनांक :- ३० मार्च, २०१७.**

**पहावे :-** १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांचे पत्र क्र.- का-प्रआ/ रस्ता हस्तांतरण/१२३७ दिनांक २१/०३/२०१७.

**प्रस्तावना :-**

नागपूर काटोल जलालखेडा राज्यमार्ग क्र.२९३ हा काटोल शहरातून जातो. या रस्त्याच्या कि.मी. ५५/०० पासून काटोल वळणमार्ग सुरू होऊन कि.मी. ६०/२०० मध्ये संपतो. काटोल वळणरस्त्याची एकूण लांबी ५.२०० कि.मी. आहे. हा संपूर्ण रस्ता सुस्थितीत असून जलालखेडा- वरूड कडे जाणारी वाहतूक या बायपास वरून जात असल्याने नागपूर काटोल जलालखेडा राज्यमार्ग क्र.२९३ चे कि.मी. ५५/०० ते ५८/३० ही ३.३० कि.मी. काटोल नगरपरिषद हद्दीतून जाणारी लांबी अवर्गीकृत करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. सदर रस्त्याच्या देखभाल - दुरुस्तीचा खर्च नगरपरिषदेकडून करण्यात येईल असा ठराव क्र.३, दिनांक १४/०३/२०१६ रोजी पारित करण्यात आला आहे.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियता, सा.बां.प्रा.विभाग, नागपूर यांचा प्रस्ताव तसेच संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक- आरबीडी-१०८१/ ८७१/ रस्ते-७, दि.०९/०३/२००१ मधील टिप ५ मधील तरतूद विचारात घेऊन, नागपूर जिल्ह्यातील काटोल नगरपरिषद हद्दीतील खालील रस्त्याची लांबी अवर्गीकृत करण्यात येत आहेत.

| | **रस्त्यांची नावे** | **अवर्गीकृत करावयाचा रस्ता** | **साखळी क्रमांक** | **रस्त्याची लांबी** |
|---|---|---|---|---|
| १ | नागपूर काटोल जलालखेडा राज्यमार्ग क्र.२९३ | टोलनाक्यापासून गळपुरा चौकापर्यंत रस्ता | ५५/०० ते ५८/ ३० | ३.३० कि.मी. |

सदर रस्ता हस्तांतरीत केल्यानंतर नागपूर जिल्ह्यातील राज्यमार्गांची एकूण लांबी **९८९.०८ कि.मी.** मध्ये **३.३० कि.मी.** ने घट होऊन एकूण लांबी **९८५.७८०** कि.मी. होईल.

उपरोक्त **३.३० कि.मी.** लांबी अवर्गीकृत करण्यात येत आहे. तसेच सदर रस्त्याच्या देखभाल-दुरूस्तीचा खर्च नगरपरिषदेकडून करण्यात येईल व अवर्गीकृत केलेल्या रस्त्यावर होणाऱ्या देखभाल-दुरूस्ती करिता शासनामार्फत कोणतेही अतिरिक्त अनुदान देण्यात येणार नाही. या अटींच्या अधीन राहून सदर काटोल, नगरपरिषद हद्दीतून जाणाऱ्या राज्यमार्गाला अवर्गीकृत करण्यास शासन मान्यता देत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३०१७०१३५०६१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2017.03.31 11:04:06 +05'30'

**(प्रशांत पाटील)**
अवर सचिव (नियोजन), महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
२) विभागीय आयुक्त, नागपूर.
३) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, नागपूर (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करण्यात यावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
४) जिल्हाधिकारी, नागपूर.
५) मुख्याधिकारी, नगरपरिषद काटोल.
६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर.
७) कार्यकारी अभियंता, (सा.बां.) जिल्हा परिषद, नागपूर.
८) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
९) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
१०) निवडनस्ती.